**महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरणासाठी राष्ट्रीय माहिती विज्ञान केंद्र (NIC) यांच्यामार्फत नवीन संकेतस्थळ आणि Case Information Management System तयार करण्यासाठी अनुदान वितरित करणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः वक्फ २०२२/प्र.क्र.४५ /का.४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: ३१. ०३.२०२२

**वाचा -**

१) अल्पसंख्याक विकास विभाग पत्र क्रमांक : वक्फ २०१९/प्र.क्र.१७४/का.४, दि.०८.१२.२०२०
२) उप व्यवस्थापक/तांत्रिक संचालक, राष्ट्रीय माहिती विज्ञान केंद्र (NIC) यांचे पत्र क्रमांक TI/२०२०-२१, दि.२५.१०.२०२१
३) शासन निर्णय, अल्पसंख्याक विकास विभाग पत्र क्रमांक : वक्फ २०१९/प्र.क्र.१७४/का.४ दि.२८.०२.२०२२
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अर्थसं- २०२१/प्रक्र. ४८/अर्थ-३, दि.६ एप्रिल, २०२१
५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक: अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१.

**प्रस्तावना : -**

महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरणासाठी राष्ट्रीय माहिती विज्ञान केंद्र (NIC) यांच्यामार्फत नवीन संकेतस्थळ /Case Information Management System तयार करण्यात येत असून सदर संकेतस्थळासाठी राष्ट्रीय माहिती विज्ञान केंद्र (NIC) यांना प्रथम टप्यातील Development Cost (Design Approval) म्हणून एकूण प्रस्तावाच्या २०% प्रमाणे अनुदान उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

## शासन निर्णय :-

महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरणास दिवाणी न्यायालयाचा दर्जा प्रदान करण्यात आलेला असून सदर कार्यालयाचे कामकाज हे न्यायालयीन कामकाजाप्रमाणेच चालते. न्यायाधिकरणामध्ये सुरु असलेल्या खटल्यांची माहिती सर्वसामान्य जनतेला उपलब्ध व्हावी यासाठी ई-कोर्टच्या धर्तीवर न्यायाधिकरणाचे संकेतस्थळ/ Case Information Management System करावयाचे असल्याने राष्ट्रीय माहिती विज्ञान केंद्र (NIC) यांच्याकडून संदर्भ क्र.१ येथील शासन प्रस्ताव मागविण्यात आला होता. त्यास अनुसरुन राष्ट्रीय माहिती विज्ञान केंद्र (NIC) यांनी त्यांच्या संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये रु.८२,०८,६५२/- (रुपये ब्याऐंशी लाख आठ हजार सहाशे बावन्न फक्त) इतक्या रकमेचा प्रस्ताव शासनास सादर केला आहे. त्यास संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आलेली आहे. आता नियोजन विभाग व वित्त विभागाने दिलेल्या मान्यतेस अनुसरुन संकेतस्थळाचे काम सुरु करण्यासाठी राष्ट्रीय माहिती विज्ञान केंद्र (NIC) यांना प्रथम टप्यातील Development Cost (Design Approval) म्हणून एकूण प्रस्तावाच्या २०% म्हणजेच रु.१६,४१,७३०/- (रुपये सोळा लाख एकेचाळीस हजार सातशे तीस मात्र) इतका निधी अदा करण्यासाठी अवर सचिव (का-१), अल्पसंख्याक विकास विभाग यांच्याकडे सुपूर्द करण्यात यावा.

२. सदर रकमेचा ईसीएस अवर सचिव (का.१), तथा आहरण व संवितरण अधिकारी, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांच्या नावाने काढण्यात यावा. यासाठी विभागातील उप सचिव (आस्थापना) यांना नियंत्रक अधिकारी घोषित करण्यात येत आहे

३. सदर बाबीसाठी होणारा खर्च "मागणी क्रमांक झेडई - १ - २०५२ सचिवालयीन सर्वसाधारण सेवा - (००)(०३) इ-गर्व्हर्नस प्रकल्पाची अंमजबजावणी (२०५२५१२५) (कार्यक्रम) १७ संगणक खर्च" या लेखाशीर्षाखाली वर्ष २०२१-२२ मध्ये उपलब्ध निधीमधून खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर शासन निर्णय, नियोजन विभाग अनौपचारिक संदर्भ क्र. अनौ.संदर्भ क्र.१०५/१४७१, दि.०८.०३.२०२२ आणि वित्त विभाग अनौ.संदर्भ क्र. ७६/२०२२/व्यय-१, दि.२८.०३.२०२२ अन्वये प्राप्त मान्यता तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्रमांक: अर्थसं- २०२१/प्रक्र. ४८/अर्थ-३, दि.६ एप्रिल, २०२१ आणि शासन निर्णय,वित्त विभाग अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आलेल्या शक्तीचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०३३११११५७०७७८१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

DINESH MADHAVRAO SONAVANE

Digitally signed by DINESH MADHAVRAO SONAVANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITY DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=9cabb099fd0576208f4caa310d2e7860201ab5363a2133e0927ff26c0f016fdf,
pseudonym=1F9A10571D88646ED6CD168DADBFEDACC3DD2F35,
serialNumber=6ADB2BDBBD3BD651A8ADE806B6E4AEA66DAA5512EA788889AF1515751ABC0181, cn=DINESH MADHAVRAO SONAVANE
Date: 2022.03.31 12:16:26 +05'30'

**( दि.मा.सोनवणे )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) महालेखापाल (१/२), लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
२) महालेखापाल (१/२), लेखा परिक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
३) अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य वक्फ न्यायाधिकरण, जबिंदा एव्हेन्यू, जिल्हा व सत्र न्यायालयासमोर, अदालत रोड, औरंगाबाद- ४३१ ००५
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य वक्फ मंडळ, पनचक्की, औरंगाबाद,
५) उप व्यवस्थापक/तांत्रिक संचालक, राष्ट्रीय माहिती विज्ञान केंद्र,११वा मजला, नवीन प्रशासकीय इमारत, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
६) सर्व अवर सचिव, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
७) सर्व कक्ष अधिकारी, अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८) स्वीय सहाय्यक, अपर मुख्य सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
९) स्वीय सहाय्यक, सह सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१०) कार्यासन-४, संग्रहार्थ/ निवड नस्ती.